**सुधारीत प्रशासकीय मान्यता-**
**न्यायमुर्तीनगर, औरंगाबाद येथे मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद परिसरामध्ये विस्तारीत इमारतीचे बांधकाम करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र. सीसीबी-११२०/प्र.क्र.५०/का-१३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- ०९ सप्टेंबर, २०२१.

**पहा :-** मा.प्रबंधक (निरिक्षणे-२), मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांचे क्र. बी (डब्ल्यू)१६२६/१९८१(१५)/७८४, दिनांक २ सप्टेंबर, २०२० चे पत्र.

**प्रस्तावना** :-

उपरोक्त संदर्भाधिन अ.क्र.१ च्या पत्रान्वये न्यायमुर्तीनगर, औरंगाबाद येथे मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद परिसरामध्ये विस्तारीत इमारतीचे बांधकाम करण्याकरीता रु.८८,७८,७६,९००/- इतक्या अंदाजित खर्चाचा सुधारीत प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्याकडून शासनास सादर करण्यात आला होता. सदरहू प्रस्तावास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

न्यायमुर्तीनगर, औरंगाबाद येथे मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद परिसरामध्ये विस्तारीत इमारतीचे बांधकाम करण्याकरीता रु.८८,७८,७७,०००/- (रुपये अठ्ठ्याऐंशी कोटी अठ्ठ्याहत्तर लक्ष सत्त्याहत्तर हजार फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमूद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाद्वारे सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | तपशिल | रक्कम |
|---|---|---|
| १ | बांधकाम खर्च (तळ मजला + ३ मजले) | ४३,३१,८९,९०८/- |
| २ | अंतर्गत विद्युतिकरण | ३,२२,६०,४३०/- |
| ३ | बाह्य विद्युतिकरण | २१,७४,७५३/- |
| ४ | ट्रान्सफॉर्मर, एमएसईबी चार्जेस | १,४९,३०,०००/- |
| ५ | पाणी पुरवठा मल:निस्सारण | २,१६,५९,४९५/- |
| ६ | फर्निचर | ९,९४,५७,३२५/- |
| ७ | अग्निशामक यंत्रणा | १,९१,३२,९९७/- |
| ८ | मैदानाचा विकास व बागबगीचा | ७०,००,०००/- |
| ९ | माती परीक्षण व भूनिरीक्षण | ५,००,०००/- |
| १० | लिफ्ट | १,७०,१४,९१४/- |
| ११ | वातानुकूलीत यंत्रणा | ४,८९,९४,१७६/- |
| १२ | आरसीसी डिझाईन चार्जेस | १०,००,०००/- |
| १३ | एसटीपी ट्रिटमेंट प्लान्ट | ५०,००,०००/- |

| | | |
|---|---|---|
| १४ | डीजी सेट | २,१२,५७,९१८/- |
| १५ | आकस्मिक खर्च ( बांधकाम खर्चाच्या ४%) | २,८९,४२,८७७/- |
| १६ | भाववाढ ( प्रकल्प खर्चाच्या ७.५%) | ४,८५,३३,४७८/- |
| १७ | वस्तू व सेवा कर (प्रकल्प खर्चाच्या १२%) | ८,६८,२८,४३०/- |
| | **एकूण प्रकल्प खर्च रुपये** | ८८,७८,७६,९०१/- |
| | **म्हणजेच एकूण रुपये** | ८८,७८,७७,०००/- |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

अ) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

ब) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

क) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि. १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

ड) काम सुरू करण्यापुर्वी सर्व संबंधित स्थानिक संस्था/प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

इ) सावर्जनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दि.०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

ई) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

फ) योजनेची अंमलबजावणी करताना प्रचलित शासन निर्णय, नियम, सीव्हीसी तत्वे, वित्तीय मर्यादा व विहित निविदा कार्यपध्दती अनुसरण्यात यावी.

ग) सदर सुधारीत प्रशासकीय मान्यतेतील तांत्रिक बाबी, निविदा विषयक क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहीत धरली जाणार नाही.

३. या प्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-८, ४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१, कार्यालयीन इमारती-०५१, बांधकाम- कार्यक्रमांतर्गत- (०३) न्यायदान (केंद्रपुरस्कृत योजना-राज्य हिस्सा), (०३) (०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम), ५३- मोठी बांधकामे (४०५९ ०६७२) व (२१) न्यायदान (केंद्रपुरस्कृत योजना- केंद्र हिस्सा), (२१) (०१) मोठी बांधकामे(कार्यक्रम),५३-मोठी बांधकामे (४०५९ १२२२)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. **मात्र, अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : ६०/२०२०/इमा-२, दिनांक १० सप्टेंबर, २०२०, नियोजन विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक : १५/१४४३, दिनांक १२ जानेवारी, २०२१, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक :५८८/२०२१/व्यय-५, दिनांक २५ जून, २०२१ आणि मा.उपमुख्यमंत्री महोदय यांच्या अध्यक्षतेखालील व्यय अग्रक्रम समितीच्या दिनांक १२ जुलै, २०२१ रोजी झालेल्या बैठकीत समितीने दिलेल्या मान्यतेनुसार आणि वित्त विभाग, शासन निर्णय क्र:-विअप्र २०१३/ प्र.क्र.३०/१३/विनियम,भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय

विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९०९११४३१९७३१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2021.09.28 15:47:26 +05'30'

**( नितीन वि. जीवने )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव,**
**महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. सभापती, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२) मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
३) मा. विरोधी पक्ष नेता, विधान परिषद/ विधानसभा ,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
४) मा.महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय , मुंबई,
५) मा.प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, औरंगाबाद.
६) मा.प्रबंधक (निरीक्षणे-२) अपिल शाखा, मा.उच्च न्यायालय, मुंबई,
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-एक मुंबई, दोन, नागपूर,
८) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद.
९) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, औरंगाबाद.
१०) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (पश्चिम) विभाग, औरंगाबाद.
(मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
११) उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम (विशेष प्रकल्प) विभाग क्र.२, औरंगाबाद.
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
१३) सार्वजनिक बांधकाम विभाग (ईमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१४) वित्त विभाग/व्यय-५, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१५) नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१६) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१७) कक्ष अधिकारी, का.७, ११ व १२, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१८) निवड नस्ती/संग्रहार्थ.